**महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास मिळणाऱ्या सवलत मूल्यांची प्रतिपूर्ती व शासनास देय असलेल्या प्रवासी कराच्या रु.८२.३४ कोटी रकमेचे पुस्तकी समायोजन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एसटीसी - ०५२४/प्र.क्र.४६/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ जून, २०२४

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः एसटीसी ३४००/६३१/सीआर-३१/परि १, दिनांक २० जुन, २०००.
२) शासन निर्णय क्रमांक : एसटीसी-०८१४/प्र.क्र.४७८/परि-१, दिनांक ४ जुलै, २०१५. व शुध्दीपत्रक दि.०८ सप्टेंबर, २०१५.
३) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/नोंदणी/७९०, दि.०७.०५.२०२४.

प्रस्तावना :-

महामंडळाने विविध सामाजिक घटकांना प्रवासी भाड्यात दिलेल्या सवलत मुल्यापोटी येणाऱ्या खर्चाची प्रतिपुर्ती करण्यात येते. महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाद्वारा १७.५ टक्के या दराने प्रवासी कराची रक्कम शासनास अदा करण्यात येते. संदर्भाधिन क्र.१ येथील दि.२०.६.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर प्रवासी करातील १२ टक्के प्रमाणे येणारी रक्कम शासनास अदा करावी व उर्वरित ५.५ टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास उपलब्ध करुन देण्यात यावी, असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला होता. तद्नंतर संदर्भाधिन क्र.२ येथील दि.०४.०७.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रवासी करातील १० टक्के दराने येणारी रक्कम भांडवली अंशदानाच्या स्वरुपात महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास पुस्तकी समायोजित करावी व उर्वरित ७.५ टक्के प्रवासी कराची रक्कम शासनाने महामंडळास देय असलेल्या सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी पुस्तकी समायोजित करावी, असा धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे. संदर्भाधिन क्र.३ येथील पत्रान्वये उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य परिवहन महामंडळ यांनी प्रवासी कराचे सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी पुस्तकी समायोजन करण्याबाबत विनंती केली आहे. त्याअनुषंगाने प्रवासी कराचे सवलत मुल्याच्या प्रतिपुर्तीपोटी पुस्तकी समायोजन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाकडून शासनास देय प्रवासी कराचा पहिला हप्ता रु.८२,३४,००,०००/- (ब्याऐंशी कोटी चौतीस लाख रुपये फक्त) इतकी रक्कम सवलत मुल्यांच्या प्रतीपुर्तीपोटी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम गृह विभाग,"मागणी क्र.बी-३ लेखाशिर्ष २०४१ वाहनांवरील कर (००) ००१, संचालन व प्रशासन, (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त (अनिवार्य) (दत्तमत) (२०४१००१८) ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने रु.८२,३४,००,०००/- खर्च दाखविण्यात यावी व लेखाशिर्ष "००४२- मालावरील व उतारुवरील कर - १०६ - कर वसूली" "(००४२ ००६२) (०१) (०२) उतारुवरील करापासून मिळालेल्या जमा रकमा" याखाली पुस्तकी समायोजनाने प्रवासी कराची रक्कम रु.८२,३४,००,०००/- जमा दाखविण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन करण्याची कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३०७/२०२४/व्यय-८, दि.१४.०५.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६०५१८०६३७००२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SARIKA MENDHE GANVIR

Digitally signed by SARIKA MENDHE GANVIR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=355d31d0cf7bf8d02352945a11a765b0f536fe1adfd0fff4aad6f9dd87f3d76b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D50DB68513E91376BA0547B675FDF1B1F3E1AB721046013C8F2C377536F96AC5, cn=SARIKA MENDHE GANVIR
Date: 2024.06.05 18:21:05 +05'30'

**( सारिका मेंढे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२.उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३.महाव्यवस्थापक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
४.वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ,मुंबई.
५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
९.महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१०.संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, मुंबई.
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११/साऊ), मंत्रालय, मुंबई.
१३. गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती/कार्यासन परि-१.